# लाडक्या पोपटास







मधु लिमये



पॉप्युलर प्रकाशन, मुंबई



# बालमित्रांनो-



आपली मायभूमि १४ वर्षांपूर्वी स्वतंत्र झाली. गोऱ्या इंग्रजांचं राज्य गेलं अन् आपल्या लोकांचं राज्य सुरूं झालं. परंतु गोवा आपल्या मायदेशाचाच भाग असूनहि अजून फिरंग्यांच्या ताब्यांत आहे. त्याला स्वतंत्र करण्यासाठीं पहिली मोठी चळवळ १९४६-४७ सालांत पोपटच्या डॉक्टरकाकांनीं (राममनोहर लोहियांनीं) सुरूं केली. या चळवळीला १९५४-५५ सालांत परत जोर चढला. आपल्या मायभूमीच्या हजारों सुपुत्रांनीं तिच्यांत उडी घेतली. फिरंग्यांनीं त्यांना लाठ्याकाठ्यांनीं मारलं. त्यांच्यावर बंदुका चालविल्या. कित्येकांना १२-१२ वर्षांच्या शिक्षा देऊन तुरुंगांत कोंडून ठेवलं. या लोकांत पोपटचे भाई (वडील) देखील होते. पूर्वी इंग्रजांनीं त्यांना अनेक वेळां असंच पिंजऱ्यांत डांबून ठेवलं होतं. पण त्यावेळीं पोपट नव्हता.

पोपटचा पहिला वाढदिवस साजरा करून त्याचे भाई गोव्याला गेले. पोपट एवढासा होता तरी त्याला कसं कळलं कुणास ठाऊक कीं आपले

भाई दूर कुठेंतरी जाणार आहेत. आपल्याला लवकर कांहीं भेटणार नाहींत. म्हणून २२ जुलैच्या रात्रीं तो मुळीं झोपलाच नाहीं. भाईंशीं खेळत बसला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं दादर स्टेशनवर भाईंना 'टा टा' करतांना त्याचा चेहरा रडवा झाला. डोळे पाण्यानें डबडबले. लहानग्या पोपटला पुढें भाई गोव्याहून पत्र पाठवायचे. मी त्याला तीं वाचून दाखवीत असे. त्यांतला कांहीं भाग त्याला समजला कीं तो हंसायचा आणि नाचायचा. दोन वेळां तो भाईंना भेटायला गोव्यालाहि गेला होता. १९५७ त त्याचे भाई सुटले नि त्याच्याशीं खेळायला परत आले.

भाईंनीं पोपटला लिहिलेलीं पत्रें त्याला फार आवडतात. तुम्हांलाहि तीं आवडतील. म्हणून त्यांचं छोटेसं पुस्तक बनवून देत आहोंत. पोपटच्या गोरेकाकांनीं त्याच्या साठीं छान छान चित्रं काढून दिलीं आहेत. तीं पाहून तुम्हांला फार गंमत वाटेल.

—पोपटची आई

१ एप्रिल १९६१

# १

अग्वाद किल्ला, गोवा.
२९ फेब्रुवारी १९५६

प्रिय अनिरुद्ध,

सर्व लोक तुझ्या आईला आणि 'धा'ताईला पत्र लिहितात. तूं लहान म्हणून तुला कोणीच पत्र लिहीत नाहीं. तेव्हां तुझ्या भाईनीं विचार केला कीं, आपणच आपल्या लाडक्या पोपटला पत्र लिहावं. पण पोपट चुरूचुरू बोलायला शिकला तरी त्याला वाचतां कोठें येतं? म्हणून हें पत्र तुझी आई तुला वाचून दाखवील. तूं मोठा झालास कीं स्वतः वाच.

पोपट, तुझी मला नेहमीं आठवण येते. पण तूं मात्र तुझ्या भाईला विसरून गेला आहेस. मला उंच टेकडीवर 'अल्तीन्'ला ठेवलं होतं. तेथें एक काव यायचा. मी कावला बिस्कीट द्यायचा, पाव द्यायचा व म्हणायचा, "काव, काव, मुंबईला खारला आमचा पोपट राहतो, त्याच्याकडे उडत उडत जा व त्याला सांग कीं, तुझे भाई तुझी आठवण करतात.





त्यांना भेटायला गोव्याला ये." पण काव होता लबाड. तो बिस्कीट खायचा, पाव खायचा, मग म्हणायचा, "मी नाहीं पोपटकडे जात; मी नाहीं तुमचा निरोप पोपटला सांगत." आणि नंतर भुर्रकन् उडून जायचा. थोड्या वेळानं एक कोंबडी व तिचीं सात पिलं यायचीं. चार पिलं तुझ्यासारखीं गोरीं होतीं व तीन भाईंच्याप्रमाणं काळीं होतीं. पोपटला कसा बाऊ आवडतो तसा कोंबडीला आणि पिल्लांनाहि आवडायचा. मग मी त्यांना दोनतीन माशाचे तुकडे द्यायचा व म्हणायचा, "कोंबडी, कोंबडी, तूं चालतचालत मुंबईला जा, पोपटला भेट व त्याला सांग कीं, भाईंना तुझी फार आठवण येते. पंपं गाडींत व झुकझुक गाडींत बसून तूं गोव्याला जा व भाईंना भेट." पण कोंबडीदेखील होती लबाड. ती फक्त बाऊ खायची आणि पळून जायची.



इकडे आम्ही तुमची रोज वाट पाहत असूं. आमच्या-जवळ चॉकोलेट होतं, बिस्किटं होतीं, केक होते. पण तें सर्व संपून गेलं तरी तुम्ही आलां नाहींत. कांहीं दिवसांनीं तुझ्या आईचं पत्र आलं. त्यांत पोपटचे दोन फोटो होते. एक जाकीट घातलेला फोटो फार सुंदर होता; दुसऱ्या

फोटोंतला पोपट फार लबाड दिसत होता. भाईंना पोपटचे फोटो फार आवडतात व ते ते नेहमीं पाहतात.

पोपटच्या आईनं आपल्या पत्रांत पोपटचं छान वर्णन केलं होतं. पोपट बूटसूट घालून बागेंत फिरायला जातो, तेथें खूप नाचतो, बागडतो. पोपटशीं खेळायला त्याची जयाताई आहे, संतोष आहे, मणीमावशीचा अनि आहे. पोपटचे लाड करायला 'धा'ताई आहे, दाणूकाका आहे; आई आहे. पण पोपटच्या भाईंना बागेंत फिरायला मिळत नाहीं; त्यांना खोलींत बंद करून ठेवतात. भाईंना पोपटशीं व जयाताईशीं खेळायला मिळत नाहीं. पोपटच्या आईला पोपटचे गोडगोड पापे मिळतात. भाईंना पोपटचे चॉकोलेटचे गोड पापे, केकचे मिट्ठास पापे कुठं मिळतात?



पोपटचे भाई गोव्याला जाण्यापूर्वीं कशी मजा यायची! पोपट भाईबरोबर व दाणूकाकांबरोबर भुर्रर् जायचा. आई-भाई त्याला झुकझुक गाडींतून फिरायला न्यायचे. एक दिवस आई, धा-ताई, भाई त्याला मासे दाखवायला घेऊन गेलीं. रंगीबेरंगी सुंदर मासे पोपटला फार आवडले. त्यांना पाहून पोपट माशासारखे हातवारे करायला लागला! आईचं



कॉलेज संपलं, धा-ताईची परीक्षा आटोपली, कीं पोपट, तूं आईला सांग—"मला परत मासे पाहायला ने; राणीच्या बागेंत घेऊन जा." राणीच्या बागेंत छान पक्षी असतात, वाघोबा असतो, हरणं असतात...



तूं भाईंना भेटायला आलास; पण तीन दिवसांत पळून गेलास!...लष्करी तुरुंगांत भाईंना भेटायला आलास, पण तुला शिस्त मुळींच माहीत नाहीं. रडायचास. कपडे खराब करायचास. बरं, भाईजवळ यायचा नाहींस. आई म्हणते, पोपट चुरूचुरू बोलतो. पण भाईंच्यासमोर पोपट कुठं बोलायचा? परत जातांना त्यानं आम्हांला भरपूर पापेदेखील दिले नाहींत! तुला पंपं गाडीची चिंता पडली होती; तुझं सर्व लक्ष पंपंकडे होतं...



आम्ही अल्तीनला असतांना तेथें कोंबड्या व बदकं यायचीं, काव यायचा. आम्ही त्यांना खायला देत असूं. तेथें आल्यापासून भो भो येतात, म्यांव येते. एक भो भो तपकिरी रंगाचा आहे. त्याला आम्ही लाल्या म्हणतों. लाल्या फार गुंड आहे. त्याला भात आवडत नाहीं. लोणी लावलेला पाव आवडतो. बाऊचे कांटे तर त्याला फारच प्रिय. भो भो कुत्रीला काल परवांच चार पिल्लं झालीं आहेत. पण तीं अजून आमच्या दारासमोर येत नाहींत.

'अल्तीन'ला असतांना पोपटचे भाई एकदां आजारी पडले. त्यांना दम्याचा त्रास व्हायचा; ताप यायचा. एक दिवस त्यांना गमतीदार स्वप्न पडलं—



एकदां संध्याकाळीं भाई बिछान्यावर पडले होते. त्यांना पोपटची आठवण झाली. त्यांच्या खिडकीपाशीं एक चिमणी आली व चिव्‌चिव् करूं लागली. भाई चिऊला म्हणाले,



"चिऊचिऊ, मला बरं वाटत नाहीं. आमचा पोपट फार हुषार आहे. तूं त्याच्याकडे जा व त्याला घेऊन ये. पोपट मला बरं करील." चिऊ शहाणी होती. ती गेली पोपटकडे व त्याला म्हणाली, "तुझे भाई आजारी आहेत; तूं त्यांच्याकडे जा व त्यांना बरं कर." पोपट म्हणाला, "मी काय डॉक्टर आहें? मी कसा भाईंना बरं करणार?" चिऊ म्हणाली, "बरं कसं करायचं तें मी तुला सांगेन." पोपट आईकडे गेला व तिला म्हणाला, "आई, मी भाईंकडे जातों. चिऊ-बरोबर जातों. वाटेंत मला भूक लागेल. तेव्हां मला खायला दे." पोपटच्या आईनं त्याला केक आणि बिस्किटं दिलीं. मग चिऊनं पोपटच्या अंगावर पंख चिकटवले व तिच्या-बरोबर तो उडत उडत भाईंच्याकडे गेला. सकाळ झाली. सूर्य उगवला व चिऊ आणि पोपट भाईंच्या खिडकींतून आंत आले. भाई झोपेंत होते. पोपट चिऊला म्हणाला, "चिऊ, तूं ओरडूं नकोस. भाई झोपले आहेत. तूं ओरडलीस तर ते जागे होतील." मग पोपट भाईंच्या जवळ आला व आपल्या गोड ओठांनीं त्यानं भाईंचे दोन





पापे घेतले व त्यांच्या कानात तो हळूच म्हणाला, "भाई, माझे पापे गोड असतात. डॉक्टरांचं औषध कडू असतं. माझ्या गोड ओठांच्या पाप्यांमुळं तुम्ही बरे व्हाल." असं म्हणून चिऊ आणि पोपट भुर्रकन् उडून गेले. भाईंनीं डोळे उघडले. पण त्यांना पोपट कोठेंच दिसला नाहीं. तो पळून गेला होता !

त्यानंतर भाई लवकरच बरे झाले व तेव्हांपासून भाईंची प्रकृति सुधारली. दमा पोपटला घाबरतो व आतां तो भाईंना त्रास देत नाहीं !

तुझी आई म्हणते, पोपट फार शहाणा आहे. वेडीं मुलं आईला त्रास देतात. तिचं ऐकत नाहींत. तूं तसा नाहींस ना ? तुझ्या आईला फार काम पडतं. सकाळीं कॉलेज, दुपारीं पुस्तकं वाचावीं लागतात, पोपटचीं सर्व कामं करावीं लागतात. पोपटचे भाई गोव्याला आहेत. त्यामुळं सर्व पैसे आईला आणावे लागतात. तेव्हां आईला तूं त्रास देऊं नकोस; तिचं सर्व ऐकत जा. धा-ताईचं ऐकत जा. दाणूकाकाला त्रास देऊं नकोस. म्हणजे पोपट सर्वांना आवडेल...

तुझा
भाई



# 2

अग्वाद किल्ला, गोवा.
१६ एप्रिल, १९५६

प्रिय अनिरुद्ध,

माझं मागचं पत्र तुला आईनं वाचून दाखविलं कीं नाहीं? मग तूं मला उत्तर कसं पाठविलं नाहींस? तुझी आई मला नेहमीं पत्र पाठविते. पण तूं फार लबाड झाला आहेस! तुझ्या भाईंना पत्र पाठवत नाहींस; भाईंना अगदीं विसरून गेलाय्‌स! इकडे तुझे भाई मात्र तुझी नेहमीं आठवण काढतात.

कांहीं दिवसांपूर्वी अनिरुद्धाच्या भाईंनीं येथें आंब्याचा जॅम-मुरंबा तयार केला. सकाळीं सर्वजण तो खातात. तेव्हां भाईंना तुझी आठवण येते. "अरे! येथें लाडका पोपट असता तर किती बरं झालं असतं. मीं केलेला मुरंबा पोपटनं आवडीनं खाल्ला असता!"



पण पोपट, तूं येथें राहायला आलास तर तुला करमेल का? येथें खेळायला संतोष नाहीं, जयाताई नाहीं, अनि नाहीं, अंजलि नाहीं. सकाळीं तोंड धुऊन कांहीं लोक चहा, कांहीं लोक दूध पितात. नंतर सर्वजण विहिरीवर आंघोळीला जातात. येथें तुला गरम पाणी मिळणार नाहीं. येथें गार पाण्यानं आंघोळ करावी लागते. स्वतःच्या हातांनीं आंघोळ करायची, कारण येथें पोपटची जनाबाई नाहीं! फार वेळ पाण्यांत डुंबायला मिळायचं नाहीं बरं का!

परत येतांना सर्वजण पाणी घेऊन येतात. कोणी मोठ-मोठ्या घागरी उचलतात (आईला विचार, घागर कशी असते, म्हणजे ती तुला चित्र दाखवील), कोणी बादल्या, कोणी डबे. तूं लहान म्हणून तूं छोट्याशा भांड्यांतून पाणी

आणायचंस! (तुझी पुण्याची सुमन आत्या आहे ना? ती जरी तुझ्यापेक्षांहि लहान होती तरी, आम्ही हिंगण्याला होतों तेव्हां पंपावर पाणी आणायला यायची.) येतांना पोपट, पाणी सांडायचं नाहीं वाटेंत!



पोपट, आम्हांला संध्याकाळीं अर्धा तास फिरायला सोडतात. पण येथें बाग नाहीं, फुलें नाहींत, सरकडी नाहीं, खेळायला छोटीं मुलं नाहींत, कांहीं नाहीं. फक्त चालायचं–एकदां पुढें नंतर मागें! दिवसभर खोलींत बंद करून ठेवतात. तुला तर सर्व घरभर फिरायची, हुंदडायची संवय, मग तुझं येथें कसं होणार? पण तुला आपले खेळ आणतां येतील. आम्ही बुद्धिबळें वगैरे खेळत असूं, तेव्हां तूं तुझ्या पंपबरोबर खेळ, भोवरा फिरव. मी तुला कागदी नावा करून देईन. पुढें धोधो पाऊस पडायला लागेल, पाणी सांचेल, मग त्यांत तूं तुझ्या नावा सोड!

पोपट, तूं लहान होतास तेव्हां तुला भो-भो फार आवडायचा. भो-भोचे व तुझे फोटो माझ्याजवळ आहेत. तूं अजून भो-भोशीं खेळतोस काय? येथें तर चार खरे भो-भो आहेत...एक आहे लालूखान. दुसरा लाल्याचा भाऊ त्याच्यासारखाच दिसतो. एक आहे पांढरी कुत्री, पण ती फार गरीब आहे. भात खायला, मासे खायला ती आमच्या दारापाशीं येते. आमच्या दाराला गज आहेत. त्यांतून आम्हांला बाहेरचं सर्व दिसतं. लाल्याला थोपटतां येतं. चौथी कुत्री मला आवडत नाहीं. (पोपट, एक, दोन, तीन, चार असे अंक तुला मोजतां येतात काय?) ती काळी आहे म्हणून नव्हे. काळीं माणसं भाईंना आवडतात. पण ही कुत्री घाणेरडी आहे. कधीं तोंड धूत नाहीं.



डोक्यात सदा चिपडं, मातींत लोळते. तिला आंघोळ घातली तरी अंग मळवते. भाईंना गलिच्छ लोक आवडत नाहींत. पोपट, तूं असा नाहींस ना? पोपट स्वच्छ तोंड धुतो, मग दूध पितो, मग जेवतो हो ना? कपडे खराब करीत नाहीं...

दोनचार दिवसांमागें पाडवा होता. त्या दिवशीं आमच्याकडे पुरणपोळ्यांचा बेत होता. त्यापूर्वीं ख्रिसमस होता. तेव्हां आम्हीं मजा केली. आमचे मित्र गमतीनें निरनिराळीं गाणीं गात होते, नाचत होते. पोपट, तुला गाणीं फार आवडतात ना? अंमळनेरला असतांना रेडिओ-वर गाणं सुरू झालं, कीं तुझं रडणं बंद व्हायचं. तूं गाणं ऐकायला लागायचास!



मध्यंतरीं आमच्याकडे एक मोठा उंदीर यायचा. तो रात्रीं नेहमीं खडबड करायचा, आमचा खाऊ खायचा पण आम्ही त्याला पकडायला गेलों कीं जायचा पळून. एकदां शेजारची म्यांव आमच्याकडे आली. तिला आम्हीं दुद दिलं, पाव दिला. म्यांव झाली खूष व म्हणाली, "बोला,



मी तुमचं काय काम करूं ?" भाई म्हणाले, "इथं एक लोंचट उंदीर येतो, आम्हांला त्रास देतो. त्याला तूं पकड." मनी म्हणाली, "बरं मी त्याला पकडतें." इतक्यांत तो उंदीर आम्हांला दिसला. अरे बापरे केवढा मोठा होता तो ! आमच्या खोलींत एक काका आहेत, त्यानीं मनीला उचललं व कॉटखालीं जो उंदीर होता त्याच्या अंगावर तिला फेकलं. उंदीर घाबरून पळूं लागला. पण मनी कसली वस्ताद ! ती त्याला थोडीच पळूं देते ? तिनें त्याची मानगूट पकडली व त्याला घेऊन गेली.



या मनीचीं छोटीं छोटीं पिल्लं आहेत. तीं कधींकधीं आमच्याकडे खेळायला येतात. पण मला खरा आवडतो भो-भो. आमचा लाल्या आणि पांढरी कुत्री फार हुशार आहेत. पावाचा तुकडा हवेंत फेकला तर खालीं पडूं देत नाहींत; वरच्यावर तोंडांत पकडून गट्ट करतात !

पोपट, समुद्र आमच्या फार जवळ आहे. आपल्या खारच्या खिडकींतून समोरचीं घरं व रस्ता दिसतो ना ? तसा आम्हांला समुद्र नेहमीं दिसतो. दिवसांतून दोन वेळां समुद्राच्या लाटा सरसर पुढें सरकतात व परत मागें जातात. लाटा जेव्हां पुढें येऊं लागतात तेव्हां समोरच्या भिंतीवर त्या आदळतात व फुटतात; मग त्यांचे तुषार चोहोंकडे उडतात !

समुद्राला मोठ्या लाटा कां येतात तुला ठाऊक आहे ? तुझी कशी आई, तशी सागरलहरी नांवाची एक बाई होती. तिचा एक लाडका मुलगा होता. चंपाताईचा कसा अनिरुद्ध, तसा सागरलहरीचा मुलगा चांदोबा. एकदां चांदोबा आईला म्हणाला कीं, "आपण लपंडाव खेळूं या. मी लपून बसतों, तूं मला पकडायला ये. मी दूर

पळून जातों, तूं मला धरायला ये." असं म्हणून चांदोबा उंच उडून आकाशांत जाऊन बसला. त्यानं आपलं तोंड काळ्या चादरींत झांकून घेतलं. चांदोबाची आई भ्यायली आणि म्हणाली, "माझा चांदोबा कुठाय्?" सर्वत्र त्याला ती शोधूं लागली. त्यामुळं समुद्रांत मोठमोठ्या लाटा उत्पन्न झाल्या. वरून चांदोबा ही सर्व गंमत पाहात होता. हळूहळू त्यानं आपल्या तोंडावरची चादर काढून घ्यायला सुरुवात केली. चांदोबाची आई स्वतःशीं म्हणायची, 'हा कोण बरं? हा चांदोबा तर नव्हे? पण हा इतका बारीक कसा झाला? आजारी तर पडला नाहीं?' (अनिरुद्धाची आई पंपंमध्यें बसून त्याच्यासाठीं खाऊ आणायला गेली होती, तेव्हां तो कसा आजारी पडला?) पण दुसऱ्या दिवशीं चांदोबा अधिक मोठा दिसला. असं करतां करतां एक दिवस चांदोबानं सर्व चादर फेंकून दिली. मग आईनं त्याला





ओळखलं. सागरलहरी त्याला म्हणाली, "चांदोबा, चांदोबा, खालीं ये. मला शंभर पापी दे." चांदोबा म्हणाला, "मी नाहीं येत जा. मी वर उंचावर बसलोंय्. तूंच वर ये." चांदोबाला भेटण्यासाठीं सागरलहरी निघाली. तिनं हात उंच केले, उड्या मारायला सुरुवात केली. पण चांदोबा तिच्या हातीं लागला नाहीं. मग चांदोबानं परत चादर अंगावर घ्यायला सुरुवात केली व तो बारीक होऊं लागला. एक दिवस तो पूर्णपणें चादरींत लपून बसला. त्याची आई कावरीबावरी होऊन सैरावैरा धावूं लागली. अमावास्येला व पूर्णिमेला म्हणून सागराच्या लाटा जोरांत पुढें येतात— आवडली ना गोष्ट, बाळा?...

मुंबईला आल्यावर तूं काय गमती करायचास! आठनऊ महिन्यांत तुझ्याशीं आम्हांला खेळायला मिळालं नाहीं! मागें आलास तो दोन दिवसांत पळून गेलास. आतां दिवाळीच्या सुटींत आठवडाभर तरी आमच्याकडे राहायला ये, म्हणजे आपण खूप मजा करूं...

तुझा
भाई





अग्वाद फोर्ट, गोवा.
२७ जून १९५६



प्रिय अनिरुद्ध,

तुला मीं कितीक दिवसांत पत्र लिहिलं नाहीं. तूं म्हणत असशील कीं भाईंना झालंय् तरी काय, ते रागावले का आपल्याला विसरले ? पण पोपट आहे भाईंचा भारी लाडका, त्याच्यावर ते कसे रागावतील ? आणि त्याची आठवण तर त्यांना सारखी येते. सकाळीं चहा पितांना मी म्हणतों : पोपट आतां उठून तोंड धूत असेल. ( पण खरंच तूं तोंड धुतोस का रे ? का आईला म्हणतोस चिऊ कोठें तोंड धुते, माऊ कोठें तोंड धुते, मग मीहि तोंड धूत नाहीं जा ! ) थोड्या वेळानं त्याची आई त्याला दुदू देईल. पोपट अळंटळं करूं लागेल. शेवटीं आई त्याला बळंच दूध प्यायला लावील. जेवतांनादेखील पोपट भाईंच्या डोळ्यांपुढें येतो. तक्रारीच्या सुरांत म्हणतो : "आई, मला भात-आमटी नको, मला चपाती नको, मला दहीसाखर हवी. बाऊ हवा." आई म्हणेल : "रोज रे तुला कोठून बाऊ द्यायचा ? तिकडे गोव्याला भाईंच्याकडे जा. तिकडे म्हणे भरपूर बाऊ मिळतो. आणि मोठा झालास कीं तूं आपलं खालच्या भय्याप्रमाणं एक दुधाचं दुकानच सुरू कर ! म्हणजे मग रोज हवं तेवढं दही मिळेल !"



पोपट, तुला आजकाल संध्याकाळीं पावसामुळं भटकायला जायला मिळत नसेल. मग तूं संध्याकाळीं काय करतोस ? घरींच धा-ताईनं दिलेल्या पुस्तकांतलीं चित्रं पाहात, आईनं आणलेल्या इंजिनाबरोबर झुक झुक, कुक कुक करीत तुला वेळ काढावा लागत असेल. तुझी आई म्हणते, आतां





आपल्या घरासमोरचा रस्ता छान डांबरी झाला आहे, घराला नवा रंग दिला आहे. तुला आवडला कां नाहीं ?

'येरे येरे पावसा' हें पावसाचं गाणं तुला येतं काय ? पावसाच्या पाण्यांत सोडायला कागदी नावा तुला कुणीं करून दिल्या कीं नाहीं ?

चारपांच दिवसांपूर्वीं रात्रीं येथें चांदोबाचं ओलं चांदणं काय पण सुंदर दिसायचं ! पण आतां ? आतां रिप रिप रिप, रिप रिप रिप. पाऊस एक सारखा पडतोय. सकाळ, दुपार, संध्याकाळ. दिवस नाहीं अन् रात्र नाहीं. त्याचा थयथयाट आपला चालूच आहे. तो दमत कसा नाहीं कोण जाणे. आपल्या खारच्या बागेंत लहान मुलं अशींच नाचतात, बागडतात. पण अंधार पडला कीं तीं थकून भागून घरीं परत येतात. जेवतात किंवा दुदू पितात. आणि मग गुपचुप झोपतात. कांहीं लोक म्हणतात सूर्य मावळला, चंद्र गुडुप झाला कीं बागेंतलीं फुलंहि डोळे मिटून घेतात.

तुझ्यासारखीं खट्याळ मुलं मात्र कधीं शांतपणें झोपत नाहींत ! तीं आपल्या आईजवळ हट्ट धरतात. म्हणतात कीं, "गोष्ट सांग नाहींतर गाणं म्हण. तर मी गाई करीन." आणि मग गोष्ट ऐकतां ऐकतां, गाणं ऐकतां ऐकतां कधीं झोपीं जातात तें त्यांनाच कळत नाहीं. दुसऱ्या दिवशीं जाग आल्यावर आईला विचारतात : "आई, त्या गोष्टींतल्या वाघोबाचं काय झालं ? पावसांत कावळ्याचं घर वाहून गेलं कां चिऊचं ?"



तुम्हीं सुट्टींत खूप खूप मजा केली असेल. रंगीबेरंगी मासे पाहायला गेलां होतां ना ? राणीच्या बागेंत गेलां होतां ना ? तेथें वाघोबा पाहिलांत, हरिण, ससा, हुप्प्या माकड सर्व कांहीं पाहिलेत आणि खुशीनं नाचलांत असं तुझ्या आईच्या पत्रांत होतं. मीं तुम्हीं सुट्टींत खूप मजा केलीत म्हटलं. पण तुला नेहमींचीच सुट्टी आहे ! तेव्हां सुट्टी म्हणजे आईची सुट्टी ! मीं तुझ्या आईला सांगितलं कीं, "पुढें पाऊस सुरू होईल, तुझं कॉलेज सुरू होईल. मग तुला वेळ होणार नाहीं. तेव्हां पोपटला घेऊन एकदां जुहूला जा." आणि खरंच तुम्ही सर्वजण मग जुहूला समुद्रावर गेलांत. तेथें तुला प्रथम समुद्र म्हणजे काय तें समजलं असेल. मागें मला भेटायला तुम्ही बोटीनें आलां होतां. पण तुला बोट म्हणजे काय, समुद्र कसा असतो, तें कांहींच कळलं नाहीं. आपली भेट जेथें झाली तेथून मीं तुला आमचा समुद्र दाखवला. पण तुझं मन त्यांत कांहीं रमलं नाहीं. आतां तरी तुला समुद्र आवडला का नाहीं ? वाळूचीं घरं कशीं बांधायचीं तें जयाताईनं तुला दाखवलं का नाहीं ? शंख आणि शिंपले वेचलेत कीं नाहीं ? आतां पावसाळा



संपला ना कीं आईला म्हण, धा-ताईला म्हण कीं, "चला, आपण परत समुद्रावर जाऊं या, तेथें खेळूं या."



खारहून समुद्र लांब आहे. पण येथून तो खारच्या बागेपेक्षांहि जवळ आहे. आम्हांला तो केव्हांहि दिसतो. आतांच बघ कीं पोपट, मी दाराजवळ बसून हें पत्र लिहीत आहें. समोर समुद्र पसरलाय. आज कीं नाहीं तो फार फार रागावलाय. त्याच्या मोठ्या थोरल्या फेसाळ लाटा लपक लपक करीत सरसावत आहेत. इतकं रागावायला त्याला काय झालं कोण जाणे. त्याच्या आईनं बहुधा त्याला चॉकोलेट दिलं नसावं! पण खरंच, त्याला गोड चॉकोलेट कुठें आवडतं? त्याला आवडतं तें खारट खारट मीठ. तेव्हां कदाचित् त्याच्या आईनं त्याला भुर्र न नेल्या-मुळंच तो रुसला असेल. नाहींतर त्या वाईट वाऱ्यानं त्याला उगाच मारल्या-झोडल्यामुळेंच संतापून तो भिंतीवर जोराजोरानं हातपाय आपटत असेल! तूं रागावलास कीं असंच त्या वेड्या समुद्रासारखं करतोस का रे?



अलिकडे आम्ही कीं नाहीं, सकाळीं चहा पिऊन झाला कीं लगेच आंघोळीला जातों. कधींमधीं पावसांत भिजतों. पूर्वी झुक झुक इंजिन सुरू झालं कीं मोठ्या नळांतून आम्हांला पाणी मिळायचं. आतां काय हवं तेवढं पाणी घ्या! वरून एक पाण्याचा मोठा लोंढाच्या लोंढा येतो. त्याच्याखालीं बसावं. डुंबावं. कपडे धुवावेत आणि परत यावं. जातां येतां मागच्या टेकड्या पाहाव्यात. आपल्या खारच्या रस्त्याच्या टोकाला आहे तशा. कशा हिरव्या-चार झाल्या आहेत. बाहेर जातांना तुझी आई तुझ्या कपड्यावर जो पोपट लटकावते त्या रंगाच्या बरं का! उंच

नारळांचीं झाडं वाऱ्यांत व पावसांत जोराजोरानं माना हालवितात. त्या झाडांचे आपल्याला नारळ मिळतात, आणि त्यांतलं गोड खोबरं तूं खातोस. तूं जुहूला गेला होतास तेव्हां नारळाचं पाणी प्यायलास कीं नाहीं, त्यांतलं पातळ खोबरें तुला आवडलं का नाहीं ?

तुला माहीतच आहे कीं, आम्हांला खोलींतच कोंडून ठेवतात. मग हात धुवायला, तोंड धुवायला आम्हांला मोठे डबे भरून पाणी आणावं लागतं. पूर्वी आम्ही दुरून इंजिनचं पाणी आणत असूं. पण आतां आम्हीं केली आहे एक जमाडी जम्मत. संध्याकाळीं आम्ही आमचे डबे ठेवतों बाहेर. त्यांत पागोळ्यांचं पाणी रात्रभर पडतं. सकाळीं उठून पाहावं तों डबे आपले भरलेले. आईला विचार पाण्याचा लोंढा कसा असतो, पागोळ्या म्हणजे काय ? ती जेव्हां खूप पाऊस पडेल त्या दिवशीं दाखवील. आणि आपल्या खिडकींतून समोर पाहिलंस तर नारळाचं उंच झाड तुला दिसेल. त्या झाडानं एक हॅट घातलेली असते. आईच्या छत्रीसारखी. ती मग वाऱ्यांत डोल डोल डोलते.





अनिरुद्ध, तुला हें मोठं पत्र मी कां लिहीत आहें याचं खरं कारण तुला ठाऊक आहे ? थोड्याच दिवसांत— ११ जुलैला—तुझा येईल वाढदिवस. तुला दुसरं सरून तिसरं वर्ष लागेल. तूं आतां हळूहळू मोठा व्हायला लागलास ! वाढदिवसाच्या दिवशीं मोठी गम्मत असते. म्हणून लहान मुलांना वाटतं कीं, वाढदिवस नेहमीं नेहमीं यावेत. तीं आईला म्हणतात : "आमचा वाढदिवस वर्षांतून एकदांच कां करतेस ? खूपखूप वेळां करत जा ना म्हणजे किती मजा

येईल.” मोठीं माणसं असतात वेडीं. तेव्हां त्यांना मात्र वाढदिवस मुळींच आवडत नाहींत !

तुझ्या वाढदिवसाच्या इतके दिवस अगोदर पत्र पाठवलं तरच तें तुला वेळेवर मिळेल, समजलास. कारण पोस्ट-मन् किनई आतांशा भारी लबाड झालेत. ते माझीं पत्रं तुम्हांला फार उशीरां देतात, कधीं देतच नाहींत. तुझ्या आईचीं पत्रंदेखील मला अधेंमधें मिळत नाहींत. आपल्या खारच्या पोस्टमनला तूं सांग कीं, “भाईचीं पत्रं लवकर आणत जा. म्हणजे मी तुला खाऊ देईन.” कदाचित् तो तुझं ऐकेल. पण काय रे, तिकडच्या पोस्टमननं तुझं ऐकलं तरी इकडच्या लबाड पोस्टमनला कोण सांगणार ?



खरंच, मीं तुझ्या वाढदिवसाबद्दल लिहितां लिहितां कांहीं तरीच लिहूं लागलों कीं ! गेल्या वर्षी, अनिरुद्ध, मी गोव्याला, नव्हतों. मुंबईला होतों. पण नंतर भाई गेले खूप दूर भुर्रं एका सभेला. तशी आई त्यांना म्हणाली, “आपल्या राजाचा आहे वाढदिवस. तेव्हां लवकर या.” अन् मग मी खरंच लवकर परत आलों. वाढदिवसाच्या दिवशीं तुला नटवलं होतं. धाताईनं आणलेला सुंदर सेलर सूट घातला होता. मृणालमावशी म्हणाली : अनिरुद्ध छान् दिसतोय. मणि-मावशी म्हणाली : तो किती गोड दिंसतोय. आणि तेव्हां-पासून तुला वाटायला लागलं कीं आपण खरोखरच सुंदर ! पण तें खरं नाहीं, पोपट. वाढदिवसाच्या दिवशीं सर्वच मुलं नटतात, थटतात, छान छान कपडे घालतात. आणि गोड गोड दिसतात.

“यंदांच्या वाढदिवसाला,” आईला म्हणावं, “माझ्या सर्व बालमित्राना बोलाव खेळायला, गम्मत करायला. भाई

नसले म्हणून काय झालं ? ते येतीलच आज नाहींतर उद्यां, पण मला का परत तिसरं वर्ष लागणार आहे ?" भाऊ-मामांचा संतोष, मृणालमावशींची अंजली, मणिमावशीचा अनि, अनुकाकाची झेलम् ( भिऊं नकोस. ती अनुकाका-सारखी दिसत नाहीं, आपल्या आईसारखी दिसते !) गोरे काकांची बंडी (तुला माहीत आहे का ते चित्रं काढतात, तुझ्या भाईचं एक भयानक चित्र म्हणे त्यांनीं काढलंय्. तेव्हां जपून. सर्वांना बोलाव. खूप खेळा, खाऊ खा अन् मज्जा करा. आणि डॉक्टरबाई आल्या तर त्यांना नमस्कार कर. तुझं सर्वच विचित्र ! गेल्या वर्षी प्रथम तूं टाटा करायला शिकलास ! आतां सर्वांना नमस्कार करत जा.

आणि आतां तर काय तुझा मोठ्ठाच थाट होणार ! तुझी आई तुला छोट्या मुलांच्या शाळेंत घालणार आहे. तेथें ना काम ना अभ्यास. म्हणे नुसतं नाचायचं, खेळायचं. नवीं नवीं गाणीं शिकायचीं, खाऊ खायचा, चित्रांचीं पुस्तकं पाहायचीं व फाडायचीं, दंगा करायचा, गम्मत करायची.



कांहीं दिवसांपूर्वी जयाताईनं सुंदर अक्षरांत मला एक पत्र लिहिलं होतं. तूंहि मोठा झालास कीं तिच्यासारखं मला पत्र लिही. सर्व अगदीं स्वतःच्या मनानं हं, कोणाचं न ऐकतां बरं का !—आणि आतां तुझ्या खळीच्या गालांचे वाढदिवसाचे शंभर शंभर पापे दे पाहूं !

तुझा
भाई



अग्वादचा तुरुंग, गोवा,
१९ जुलै, १९५६

प्रिय अनिरुद्ध,

तुझ्या वाढदिवसासाठीं पाठविलेलं पत्र तुम्हांला पोस्टमननं आणून दिलं का नाहीं? तुझ्या आईनं तें तुला वाचून दाखविलंच असेल. आणि काय रे, त्या काजव्या-बरोबर पाठविलेला निरोप तुला मिळाला कीं नाहीं?

परवां आमच्याकडे मोठीच गम्मत झाली. येथें काजव्यांचा एक मोठा मेळावाच भरला होता. लुकलुकणारा काजवा तूं कधीं पाहिला आहेस? तूं राहातोस मुंबईला खारला. तुला सायकल, पंपं, बस, झुकझुक गाडी, सारं माहीत आहे. तुम्हां खारच्या मुलांना घुर्र घुर्र करीत पक्ष्यांप्रमाणं उडणारीं विमानं देखील नेहमीं बघायला मिळत असतील. पण तुमच्याकडे रात्रीं ताऱ्याप्रमाणं चमकणारे काजवे कोठें आहेत? इकडे मात्र वाटेल तेवढे काजवे...



येथें किनई रात्रीचे ९॥ वाजले कीं सर्वत्र अगदीं शांत होतं. कोणी गायचं नाहीं नी बोलायचं नाहीं. दिऊ बारीक करायचा अन् गुपचुप झोपायचं. मधें एकदां मी रात्रीं असाच बिछान्यावर पडलों होतों. कांहीं केल्या मला झोपच येईना. सारखी, पोपट, तुझी आठवण यायची. इतक्यांत किती तरी काजवे आमच्या खोलींत शिरले व लुक लुक करीत इकडे तिकडे फिरायला लागले. कांहीं थेट माझ्या बिछान्यावर आले, व एक तर लपकन् माझ्या हातावरच येऊन बसला. होता इवलासा; पण त्याची लुकलुक किती! मीं त्याला म्हटलं,



"कोण रे तूं ? बराच धिट्टुकला दिसतोस कीं ! तुला माझी भीति नाहीं का वाटत ?" तशी तो म्हणतो कसा :

"मी ? माझं नांव राज ! मी वाघाला भीत नाहीं, अंधाराला भीत नाहीं, कोणालाच भीत नाहीं !"

तेवढ्यांत दुसरा एक काजवा लुकलुकत आला व माझ्या दुसऱ्या हातावर येऊन बसला. मीं विचारलं :

"आणि तूं रे कोण ?" त्याबरोबर सर्वच खदखदा हसायला लागले : लुकलुकलुक, लुकलुकलुक.

"काय रे, हसायला काय झालं ? चावटच दिसतां तुम्ही सगळे."



त्यावर पहिला काजवा बोलला : "अहा रे ! वेडेच आहांत कीं ! एवढे मोठे झालांत तरी कोणाला 'रे' म्हणावं समजत देखील नाहीं ! अहो ही अंजुताई. या तिच्या दोन दोन वेण्या, आणि हा तिचा फुलाफुलांचा फ्रॉक !"

"आणि हें कोण ?"

“ही झेलम, ही उमा, ही बंडी, हा अनि व हा संतोष!”

“अरे! पण तुम्ही सर्व रात्रीं गाई करायची सोडून इकडे काय करताय? तुमचे आईवडील तुम्हांला रागें भरत नाहींत का?”



त्यावर तो काजवा म्हणतो: “माझे भाई किनई हरवले आहेत. किती दिवस झाले घरींच येत नाहींत! तेव्हां आई म्हणाली: ‘दिवसभर नुसता हुंदडतोस काय? जा भाईंना शोधून घेऊन ये.’ म्हणून मी माझ्या मित्रांना व मैत्रिणींना म्हणालों: ‘चला, माझे भाई कोठें लपलेत तें आपण पाहूं या.’ त्यांना शोधत शोधत आम्ही इकडे आलों आहोंत. का हो, तुम्हांला दिसले कुठें आमचे भाई?”

मी म्हणालों: “हें बघ, मी तुझे भाई शोधून काढीन. पण तूं अगोदर माझं एक काम कर. आमचा एक मुलगा असतो खारला. त्याचा आहे परवां वाढदिवस. मला तर फिरंग्यांनीं ठेवलं आहे डांबून. तेव्हां तूंच त्याला माझा निरोप सांग, वाढदिवसाचं बक्षीस त्याला दे.”

माझं बोलणं ऐकून तो झाला खूष, व आपल्या मित्र-मैत्रिणींचा ताफा घेऊन, भुर्रकन् उडून गेला. मी खिडकींत उभा राहून किती वेळ त्यांच्याकडे पाहात होतों......

लुक लुक लुक, लुक, लुक, लुक!



काय रे, तुझ्या वाढदिवसाच्या दिवशीं खरंच तो तुमच्याकडे आला होता का रे? त्यानं तुला माझा निरोप सांगितला? खाऊ दिलान्?

तुझ्या वाढदिवसाच्या दिवशीं आम्हीं येथें कित्ती मजा केली. सकाळीं उठून छानदार गरम गरम चहा बनविला. चहाबरोबर पाव व चीज खाल्लं. आंघोळ करून आल्यानंतर

तुझे सर्व फोटो बाहेर काढले. एक वर्षापूर्वी काढलेला, हळूच हसणारा पोपट; उभ्या रेघांचा स्वेटर घालून काढलेला, ओंठ दाबून पाहाणारा गंभीर चेहऱ्याचा पोपट; बुश शर्टी-तील पोपट; बूट घालतांना मिस्कीलपणें हसणारा पोपट; डोळे बारीक करून कशाकडे तरी बोट दाखविणारा नाटकी पोपट; आमच्याजवळ सर्व प्रकारचे फोटो आहेत.



नंतर आम्हीं तुझ्या आईच्या पत्रांतली तुझ्या पहिल्या वहिल्या बोलांसंबंधींचीं, तूं केव्हां कसा चालूं लागलास त्याचीं, तूं काय काय गमती करतोस त्यांचीं सुंदर वर्णनं वाचलीं...



संध्याकाळीं तिकडे खारला तुझे सगळे बालमित्र, मैत्रिणी जमल्या असतील. आम्ही देखील येथें इतकी मजा केली कीं कांहीं विचारूं नकोस! आमच्या खोलींत कीं नाहीं, मी आणखी तीन काका आहेत. त्यांतला एक काका आहे कमालीचा आळशी. त्याला चमचा धुवायचा देखील येतो कंटाळा! तो म्हणतो : "मी आपला हातानंच जेवेन. मला नको तुमचा कांटा नि चमचा!" त्या दिवशीं दुसरे दोन काका मला म्हणाले कीं, "तुम्ही नका आज कांहीं काम करूं. आज तुमच्या अनिरुद्धाचा वाढदिवस म्हणून तुम्ही नुसते बसा वाचत, नाहीं तर गप्पा मारत." अन् खरंच मग सर्व काम त्या दोन काकांनींच केलं. छान भजीं केलीं, पुऱ्या केल्या, तुझ्या आईनं पाठ-विलेल्या पापड्या-कुरड्या तळल्या, बदाम-बेदाणे घातलेलें गोड गोड पायसम् (म्हणजे एक प्रकारची खीर बरं का) तयार केलं. हे सर्व पदार्थ थोडे थोडे नानाकाका आहेत ना, त्यांच्याकडे आम्हीं पाठविले; व त्यांनीं तुझ्या वाढदिवसा-निमित्त सुंदर खीर केली होती ती आम्हांला पाठविली.





आम्ही जेवायला बसण्यापूर्वी एका काकानं दोन उदबत्त्या पेटवल्या. (तूं उदबत्ती पाहिली आहेस का? कित्ती छान वास येतो तिचा!) दुसऱ्या एका काकानं ऊद जाळून त्याच्या धुरानें सर्व खोली भरून काढली! तिसऱ्या काकानं मोगऱ्याच्या फुलांच्या व पानांच्या डहाळ्या एका ग्लासांत ठेवल्या. अशा थाटांत मग आम्ही जेवलों! अनिरुद्ध, अशी मजा आम्हांला कांहीं नेहमीं मिळत नाहीं. त्यामुळं तुझा हा वाढदिवस सर्वांच्या चांगला लक्षांत राहील.

लाडक्या अनिरुद्धा, तूं दोन वर्षांपूर्वी जेव्हां आम्हांला मिळालास, तेव्हां होती आषाढी एकादशी. या दिवशीं कांहीं लोक उपास करतात. पण बहुतेकांचा उपास असतो खोटा खोटा. उपास करायचा म्हणजे दिवसभर दाणे, खजूर, खिचडी वगैरे सारखं चरत राहायचं. तूं एकादशीला झालास म्हणून माझे कांहीं मित्र म्हणाले, तुमच्या मुलाचं आम्ही नांव ठेवणार 'विठोबा.' त्यांतला एक नारायण काका (तुझा दाणूकाका नव्हे, फेणाणी काका) आहे भारी लबाड. मला वाटलं: 'हा सर्वांना सांगत सुटला कीं खरोखरच तुझं नांव पडेल विठोबा.' तेव्हां मी त्याला म्हणालों, "अरे, आमच्या काळुमिया पोपटला (त्यावेळीं तूं काळा दिसायचास म्हणून आई तुला काळुमिया म्हणायची.) विठोबा म्हणूं नका. त्याचं एक सुंदर नांव आम्ही ठेवणार आहों!" मी तुझ्या आईला म्हणायचा कीं, 'काळुमिया हें पोपटचं नांव ठेवा.' तुझी आई म्हणायची, "नको, तें चांगलं नाहीं, हेंच ठेवा!" असं करतां करतां मी म्हणालों, 'बरं, आपण त्याचं नांव अनिरुद्धच ठेवूं.' तुझी आई बोलली, "वा! फार छान. अनिरुद्ध नांव मोठं गोड आहे."

झालं तेव्हांपासून विठोबाचा झाला अनिरुद्ध! परवां आषाढी एकादशी झाली ना? तेव्हां येथल्या आमच्या मित्रांना मीं ही गोष्ट सांगितली. त्याचं त्यांना फार हसूं आलं!

मागच्या पत्रांत मीं तुला लिहिलं होतं कीं, येथें पाऊस सारखा रिप रिप पडतोय म्हणून. त्यानंतर त्याला काय झालं कोणास ठाऊक. तो जो दडून बसला तो पंधरा दिवस मुळीं आलाच नाहीं. अखेर काल स्वारीनं तोंड दाखविलं. पण आतां तो फार शहाणा झालाय! रात्रभर पडला, पण सकाळीं आंघोळीच्या वेळीं मात्र थांबला. पावसामुळं दगडांनीं बांधून काढलेला आमचा रस्ता फार निसरडा झालाय्. पाय घसरून आपटायची भीति! म्हणून आम्ही सर्व जपून चालत होतों. पण वरच्या हिरव्यागार टेकड्यांवर चरणाऱ्या गाई, त्यांचीं पांढरीं–काळीं-तांबडीं वासरं त्यांना पाय घसरायची कशी भीति वाटत नाहीं? तीं आपलीं टुण टुण उड्या मारत चरत असतात. तशाच त्या शेळ्या व त्यांचीं गोजिरवाणीं कोकरं. आम्हांला टेकडीवर जातां येत नाहीं, त्यांच्याशीं खेळतां येत नाहीं. आमच्याबरोबर नेहमीं एक बंदुकवाला असतो. तो आम्हांला कोठला जाऊं द्यायला! तो म्हणतो: “अंघोळ झाली, कपडे धुवून झाले कीं चला परत आपल्या खोलींत!” नंतर तो कडी लावतो, एक भलं मोठं कुलूप घालतो, आणि म्हणतो: “बसा आंत गुपचुप. फिरायचं नाहीं, खेळायचं कांहीं नाहीं!”

पूर्वीं तुला मीं आमच्याकडच्या त्या काळ्या, घाणेरड्या कुत्रीची गोष्ट सांगितली होती, आठवतं? ती येथल्या एका काकाची आहे आवडती. तो तिला बोलावतो व बसायला एक तरट देतो. आतां इतकी मोठी झाली तरी अजून तिला शहाणपणा कसा तो माहीत नाहीं! मागच्यासारखीच



अस्वच्छ असते. आणि बदमाष तर किती आहे म्हणून सांगूं? एक काका जेवण झाल्यावर कावळ्यांसाठीं मूठभर भात अंगणांत फेकतो. त्यासरशीं काव काव करत कावळे येतात व भाताचीं शितं टिपूं लागतात. पण ही बदमाष काळी कुत्री? ती त्यांच्या अंगावर चालून जाते व मग कावळे घाबरून उडून जातात! इकडे तिचा डबा भरलेला असतो भातानं आणि कांद्यानं (बाऊच्या). पण त्यांतलं न खातां ती आपली द्वाडपणें कावळ्यांच्या मागें धावते. मग कधीं कधीं दुसरा काका तिला छान टप्पल देतो, तेव्हां कुठं ती वठणीवर येते!



पोपटा, दुसऱ्याला असं त्रास देणं, त्यांना छळणं चांगलं का? असं करणाऱ्यांना लोक शहाणं म्हणत नाहींत. तुझी आई म्हणते कीं, तूं देखील लहान मुलांना त्रास देतोस, त्यांना मारतोस! लोक तुझ्या आईला म्हणत असतील : "चंपाताई, तुमचा मुलगा भारी हूड आहे!" मी बाहेर आल्यावर मला म्हणतील : "तुमच्या मुलाला आवरा. काय ही त्याची गुंडगिरी! किती मारकुटा झालाय्!" लोकांनीं आम्हांला असं विचारलं तर, लाडक्या, आम्हीं त्यांना काय उत्तर द्यायचं?

मध्यंतरीं डॉक्टर आले होते तेव्हां म्हणे तूं फार खादाडपणा करून आजारी पडलास? दुसऱ्यांनीं वाटेल तितका खाऊ दिला, म्हणून आपण तो सर्व थोडाच घ्यायचा! त्यांना नको म्हणावं. मी बघ! मी नाहीं बुवा इथं कधीं आजारी पडत. तूं आजारी पडलास तर तुझे लाड करायला आहे तुझी आई आणि धा-ताई. आम्हांला कोण?

धा-ताईला व दाणूकाकाला भाईंनीं नमस्कार सांगितलाय् म्हणून सांग. आणि तूं, अंजुताई, संतोष सर्वांना खूप खूप पापे.

तुझा
भाई



कारवार.
२ फेब्रुवारी १९५७

प्रिय पोपट,

तुला मीं किती तरी दिवसांत पत्र लिहिलेलं नाहीं, गोष्टी सांगितलेल्या नाहींत. त्यामुळं तूं रागावला असशील. आतां तुला हें पत्र लिहितोंय खरं. पण तें आईनं वाचून दाखविण्यापूर्वींच बहुधा पोपटला त्याचे भाई व भाईना त्यांचा लाडका पोपट भेटलेला असेल! आणि कुठं? गोव्याच्या, पोर्तुगीजांच्या तुरुंगांत नाहीं. तिकडे मुंबईला आपल्या घरीं. कायमचा!

मागें दसऱ्याच्या वेळेस आई अन् विनायककाकाबरोबर तूं मला भेटायला आला होतास. तेव्हां माझ्याशीं खूप खूप गप्पा मारल्यास. मला म्हणालास, "भाई, मी आतां शाळेंत जातों! इनाबाईंच्या 'पुष्पविकास' मधें!"

मीं विचारलं, "इनाबाई कोण?"



तूं म्हणालास, "आमच्या बाई. माझे फार लाड करतात!"

नंतर मी तुला आंत आमच्या खोलींत घेऊन गेलों. पोपट, खोली कसली? राणीच्या बागेंत वाघोबांना ज्या पिंजऱ्यांत ठेवतात तसलाच लोखंडी गजांचा पिंजरा होता तो, नाहीं का? पण पोपटा, आतां मी पिंजऱ्यांत नाहीं! कित्ती कित्ती दिवसांनीं बाहेर मनसोक्त बागडायला मिळत आहे. वर सुंदर निळं आकाश आहे. त्यांत चांदण्या लुकलुकत आहेत आणि मी त्यांना म्हणतोंय, "उद्या सकाळीं आम्ही मोठ्या पंपमधून बेळगांवला जाणार. तेथून पुणं अन् मुंबई. आणि मग एक लब्बाड मुलगा आम्हांला भेटणार!" कदाचित् पुण्यालाच भेटेल, हो कीं नाहीं?

तेरा-चौदा महिन्यांपूर्वीं मी उंचावरच्या अल्तीन्न तुरुंगांत होतों. तेथें पोर्तुगीजांनीं सांगितलं, "तुला आतां १२ वर्षं कोंडून ठेवणार! दार बंद करणार अन् त्याला

भलं मोठं टाळं ठोकणार!" तेथें आमच्यासाठीं एक गोरा पोर्तुगीज जेवण घेऊन यायचा. मला चिडवायचा, "आतां तुला आम्ही सोडतों का बघ! तुला गोवा पाहिजे ना? मग बस आतां पिंजऱ्यांत गुपचुप!" मी म्हणायचा, "नाहीं सोडलंत तर नाहीं सोडलं!" तो म्हणायचा, "तूं जेव्हां घरीं जाशील तेव्हां तुझा 'फिल्य' ('फिल्य' म्हणजे कोण ओळख पाहूं?) हा एवढा मोठा झाला असेल! कदाचित् कॉलेजांतहि जायला लागेल!"



पण एका वर्षांत काय गम्मत झाली बघ! सात-आठ दिवसांपूर्वी एक पोर्तुगीज शिपाई आमच्याजवळ आला व खुणा करून म्हणाला, "प्रा काझा, आतां तुम्ही घरीं जाणार." आम्हांला खरंच वाटेना. पण आज सकाळीं एका मोठ्या पंपमध्यें बसवून, वेड्या-वाकड्या रस्त्यांनीं खूप फिरवून त्यांनीं आम्हांला कारवारजवळ आणून सोडलं आणि म्हणाले, "बाय, बाय! जा आतां तुम्ही!"

पोपट, तुझे भाई सुटले; दुसरे काकाहि सुटले. पण अजून बरेच लोक पिंजऱ्यांतच आहेत रे! तुला ती सुधामावशी आठवते का रे? आईबरोबर कैंप्याच्या तुरुंगांत तुम्ही तिला भेटायला गेलां होतांत! आणि तिनं तुला खाऊ दिला होता! ती अजून पिंजऱ्यांतच आहे! पोपटा, हे सर्व पक्षी जेव्हां भुर्रकन उडून जातील तेव्हां खरी मजा येईल नाहीं?

बरं, आतां पुरं करतों हं पत्र. मी दमलोंय फार. आणि माझ्या कानांत कोणी तरी म्हणतंय, "जा, झोप आतां. उद्यां सकाळीं पंपमधून जायचंय ना? मग लवकर उठलं पाहिजे. आळश्यासारखं झोपून चालणार नाहीं!" तेव्हां आतां हें पत्र देतों पोस्टमनला आणि लावतों रेस त्याच्याबरोबर. बघूं दे, हें पत्र पोपटजवळ अगोदर जातं का त्याचे भाई!

तुझा
भाई

गोवा मुक्ती संग्रामाच्या लढ्याच्या वेळी तुरुंगात असताना मधु लिमये यांनी आपल्या एक वर्षाच्या मुलाला लिहिलेली ही पत्रे. या आंदोलनाच्या सुवर्णमहोत्सवा निमित्ताने या पुस्तकाचे पुनर्मुद्रण आम्ही करीत आहोत!

आपल्या मुलाच्या भावविश्वातील वेगवेगळया विषयांवर त्याच्याशी केलेले हे हितगुज आहे. ऐतिहासिक दृष्टीने आणि साहित्य म्हणूनही ही पत्रे वाचण्यासारखी आहेत.



किंमत : रु. २०.००

(म - १११)

ISBN 81-7185-550-4

पॉप्युलर प्रकाशन



मुखपृष्ठ व चित्रे : प्रभाकर गोरे